GR-200407291712015001-1100

महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाची पारंपारिक ऊर्जा योजना ग्रामीण विद्युतीकरणासकट पचायत राज संस्थेकडे हस्तातरीत करण्याबाबत अभ्यासगटाची व उच्च स्तरीय समितीची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांक इएसए १००१/प्र.क्र.७१२१/ऊर्जा-५

उद्योग;ऊर्जा व कामगार विभाग,

मंत्रालय,मुंबई-४०००३२.

दिनांक ३.६.२००२.

**प्रस्तावना**.-

घटनेच्या ७३ व्या दुरुस्तीनुसार (सन १९९२) सत्तेचे विकेंद्रीकरण करण्याच्या दृष्टीने ग्रामपंचायत, मध्यस्तरीय पचायत (तालुका पंचायत) आणि जिल्हा पंचायत अशी त्रिस्तरीय पध्दत स्विकारण्यात आली असून या घटना दुरुस्तीनुसार घटनेच्या अनुसूची ११ मधील २९ विषयांचे पंचायत राज संस्थाकडे हस्तांतरण करावयाचे आहे. अनुसूची ११ मधील विषयांपैकी १४वा विषय " विद्युत वितरणासकट ग्रामीण विद्युतीकरण" हा आहे. सदर विषय पंचायती राजसंस्थांकडे हस्तांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन असून यासाठी ग्राम विकास विभागाने सुचविल्याप्रमाणे अभ्यासगटाची स्थापना करावयाची आहे. सदर अभ्यास गटाने केलेल्या शिफारशींवर, उच्चस्तरीय सचिव समितीने घेतलेल्या अंतिम निर्णयावर शासन स्तरावर निर्णय घेऊन सदर विषय पंचायती राज संस्थाकडे हस्तांतरीत करावयाचे प्रस्तावित आहे.

**शासन निर्णय:-**

वर विशद केलेल्या परिस्थितीचा विचार करुन खालीलप्रमाणे अभ्यासगटाची व उच्चस्तरीय समितीची नियुक्ती करण्यात येत आहे.

अभ्यासगटाची संरचना खालीलप्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| १) मा.श्री. प्रमोद देव,<br>सदस्य विद्युत नियामक आयोग | अध्यक्ष |
| २) श्री. प्रशांत कुळकर्णी, मुख्य अभियंता<br>(मांडूप शहर परिमंडळ)म.रा.वि.मं. | सदस्य |
| २) श्रीमती अश्विनी भिडे,<br>मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर | सदस्य |
| ३) श्री. चंद्रकांत दळवी,<br>मु.का.अ.जिल्हा परिषद,अहमदनगर<br>जिल्हा परिषद अहमदनगर | सदस्य |
| ५) श्री.हर्षवर्धन सकपाळ,<br>माजी जिल्हा परिषद अध्यक्ष, बुलढाणा | सदस्य |
| ६) श्री.जीवनराव गोरे,<br>अध्यक्ष,जिल्हा परिषद उस्मानाबाद | सदस्य |

७) श्री.बी.व्ही. काळे, सदस्य
.अध्यक्ष, जिल्हा परिषद लातूर

८) श्री र.य. गगावणे, सदस्य
सह सचिव वित्त विभाग.

९) श्रीमती जयश्री चौधरी, सदस्य सचिव तथा निमंत्रक
उप सचिव ग्रा.वि.व ज.सं.विभाग

**उच्चस्तरीय समितीची संरचना खालीलप्रमाणे राहिल.**

१) प्रधान सचिव (ऊर्जा) अध्यक्ष.
२) प्रधान सचिव (वित्त) सदस्य.
३) प्रधान सचिव (नियोजन) सदस्य
४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सदस्य.
विद्युत मंडळ,
५) सचिव, ग्राम विकास विभाग - सदस्य सचिव /निमंत्रक)

वरील अभ्यासगट समितीने अभ्यासगटाची स्थापना झाल्याच्या दिनांकापासून दोन महिन्याच्या कालावधीत अंतीम अहवाल उच्चस्तरीय समितीकडे सादर करावा. उच्च स्तरीय समितीने अभ्यासगटाचा अहवाल प्राप्त झाल्यावर सदरहू अहवालावर एक महिन्यात निर्णय घेऊन आपला अंतिम अहवाल शासनाकडे सादर करावा.

वरील अभ्यासगट समितीच्या बैटकाचे आयोजन सदस्य सचिव तथा निमंत्रक यांनी करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श्रीमती लक्ष्मी गोपालन्)
शासनाच्या सह सचिव.

प्रति,

१) मा.मुख्य सचिव.
२) प्रधान सचिव (नियोजन)
३) प्रधान (वित्त)
४) प्रधान सचिव (ऊर्जा)
५) सचिव,सा.प्र.वि.
६) सचिव, ग्रा.वि.वि.
७) सचिव,विधी व न्याय विभाग.
८) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ,
९) अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग,
१०)मा.श्री. प्रमोद देव,सदस्य विद्युत नियामक आयोग - अध्यक्ष
११)श्री. प्रशांत कुळकर्णी, मुख्य अभियंता (भांडूप शहर परिमंडळ -सदस्य
१२)श्रीमती अश्विनी भिडे, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर-सदस्य
१३) श्री. चंद्रकांत दळवी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अहमदनगर-सदस्य
१४)श्री.हर्षवर्धन संकपाळ, माजी जिल्हा परिषद अध्यक्ष, बुलढाणा - सदस्य.